"रबर कोटेड ताडपत्र्यां" करिता दर करार करण्याबाबत.

GR-20040731152416001-1100

महाराष्ट्र शासन

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,

शासन निर्णय क्रमांक: भांखस 1094/(2692)/उद्योग-6,

मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 8 फेब्रुवारी, 1995.

संदर्भ:- 1) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस 1088/(2512)/उद्योग-6, दिनांक 2 जानेवारी, 1992.

2) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र.लाखा-1/रबर टारपोलीन दरकरार/94-95/अे-8802, दिनांक 18 मे, 1994.

## शासन निर्णय

शासनाच्या विकेंद्रीकरणाच्या विद्यमान धोरणानुसार मर्यादित विभागांना लागणारे साहित्य संबंधित विभागांनी परस्पर एकमताने खरेदी करावयाचे आहे. त्यानुसार रबर कोटेड ताडपत्र्यांसाठी प्रामुख्याने गृह विभाग व अन्न व नागरी पुरवठा विभाग यांच्याकडून मागणी असल्याने त्या संदर्भाधीन शासन निर्णयाच्या परिशिष्ट-1 मध्ये बाब क्र.19 म्हणून अंतर्भूत करण्यात आल्या होत्या.

परंतु अलिकडे मंत्रालयीन इतर विभागांनीही रबर कोटेड ताडपत्र्यांची केलेली मागणी लक्षात घेता रबर कोटेड ताडपत्र्यांसाठी भांडार खरेदी संघटनेने दरकरार करणे संयुक्तिक होईल.

त्यासाठी उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.भांखस-1088/(2512)/उद्योग-6, दिनांक 2 जानेवारी, 1992 च्या शासन निर्णयातील परिशिष्ट-1 मधील क्र.19 मधून "रबर कोटेड ताडपत्र्या" ही बाब वगळण्यात येऊन ती या शासन निर्णयाच्या परिशिष्ट चार खाली अनुक्रमांक 33 "रबर कोटेड ताडपत्र्या" म्हणून दाखविण्यात येत आहे. त्यानुसार यासंबंधीचा दरकरार यापुढे मध्यवर्ती भांडार खरेदी संघटनेमार्फत करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ.वि. राराविकर,

कार्यासन अधिकारी.

प्रति,

वि. आ.(उ), व म.खा.अ., उद्योग संचालनालय, मुंबई-400 032,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-2, नागपूर,
महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-2, नागपूर,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई-400614,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
आयुक्त, महानगरपालिका, मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर/सोलापूर/कोल्हापूर/ठाणे/पिंपरी-चिंचवड/कल्याण/अमरावती/नाशिक,
सर्व नगरपरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व शासकीय महामंडळे/मंडळे/उपक्रम.